आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत बांधील स्वरुपाच्या बाबींकरीता निधी वितरण.
(कार्यक्रम खर्च - मागासवर्गीय कल्याण लेखाशीर्ष २२२५ ४१२२ )

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र. ०२ / कार्यासन-६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-**४०० ०३२
**दिनांक :- १७ सप्टेंबर,२०२१.**

**वाचा :-**

१. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८ /अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
२. शासन निर्णय, आ.वि.वि. क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/कार्यासन-६, दि.०७.०४.२०२१, दि.२८.०४.२०२१, दि.१७.०५.२०२१, दि.१.०६.२०२१, दि.०५.०७.२०२१, दि.०४.०८.२०२१, दि.०१.०९.२०२१
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे अ.शा.पत्र, क्र.लेखा/१४, दि.१७.०८.२०२१.

**प्रस्तावना : -**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयास अनुसरून अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण ( BEAMS) वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या मर्यादेत तसेच स्वतंत्र नस्तीवर वित्त विभागाच्या मान्यतेने मागणी क्र.टी-५ मधील अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती (कार्यक्रम खर्च)(२२२५ ४१२२) योजने अंतर्गत बाब क्र.१०-कंत्राटी सेवा व १३-कार्यालयीन खर्च या उद्दीष्टाखालील अर्थसंकल्पित तरतूदीच्या ५० टक्के मर्यादेत आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना यापुर्वी निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

सद्यस्थितीत राज्यात ८ समित्या कार्यरत असून नविन ७ समित्यांचे कामकाज सुरू करण्याबाबतची कार्यवाही सुरू आहे. विभागांतर्गत अनुसूचित जमाती प्रमाणपत्र वैधता तपासणी समितीचे कामकाज नियमितपणे चालू राहणे अत्यंत गरजेचे असून शैक्षणिक वर्षाच्या सुरूवातीला विशेषत: या समित्यांना अतिरिक्त कामकाज/ उद्दीष्ट देण्यात आलेले आहे, ही बाब विचारात घेऊन संदर्भाधीन क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरुन कार्यक्रम खर्चांतर्गत मागासवर्गीय कल्याण शीर्षाखालील मागणी क्र.टी-५ मधील (०२)(२४) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती (कार्यक्रम खर्च) (२२२५ ४१२२) अंतर्गत १०-कंत्राटी सेवा व १३-कार्यालयीन खर्च या उद्दीष्टाखाली वाढीव २५ % निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

आदिवासी विकास विभागाच्या "कार्यक्रम खर्च" अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण खालील अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती (२२२५ ४१२२) या योजनेच्या बाब क्र.१०-कंत्राटी सेवा व १३-कार्यालयीन खर्च या उद्दीष्टाखाली वित्त विभागाने सहमती दर्शविल्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतूदीच्या ७५ टक्के मर्यादेत यापुर्वी वितरीत तरतुद विचारात घेता खालीलप्रमाणे वाढीव निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| योजनेचे नांव | उद्दीष्ट क्रमांक | २०२१-२२ साठीची अर्थसंकल्पिय तरतूद | यापुर्वी वितरीत निधी | सदर शा.नि.अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| (०२)(२४) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी (२२२५ ४१२२) | १०-कंत्राटी सेवा | ३००.०० | १५०.०० | ७५.०० |
| | १३-कार्यालयीन खर्च | २९१.०० | १४५.५० | ७२.७५ |
| **एकूण** | | **५९१.००** | **२९५.५०** | **१४७.७५** |

२. वरीलप्रमाणे **एकूण रू.१४७.७५ लाख (अक्षरी रूपये एक कोटी सत्तेचाळीस लाख पंचाहत्तर हजार फक्त)** इतका निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर निधी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा. वितरीत निधी खर्च करतांना संबंधितांमार्फत राज्यशासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेमधील तरतुदी व सर्व अटी शर्तीचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत त्यांच्या अनौ.सं.क्र.७८८/व्यय-१४,दि.०६.०९.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०८१७११४८९२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2021.09.17 16:58:19 +05'30'

(रविंद्र दि.औटे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. महालेखापाल (लेखापरिक्षण)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवड नस्ती (का-६).